पाल, ता.रावेर, जि.जळगांव येथील आदिवासी मुलांचे शासकीय वसतिगृह स्थलांतरित करुन फैजपुर, ता.यावल, जि.जळगांव येथे सुरु करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- आवगृ-१३२३/प्र.क्र.८५/का.१२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. १० जुलै, २०२३

**वाचा :-** १) आदिवासी विकास विभाग, शासन पत्र क्रमांक आवगृ-१२०४/प्र.क्र.२०/का.-१२, दि.२१.०८.२००४.
२) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यावल यांचे पत्र क्र.वसगृ २०२०/प्र.क्र./का.४(३)/२९५०, दि.२३.०६.२०२३

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये दि.२१.०८.२००४ रोजी पाल, ता.रावेर, जि.जळगांव येथे मुलांचे वसतिगृह मंजूर करण्यात आलेले आहे.

संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रान्वये प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, यावल यांनी खालील वस्तुस्थिती शासनाच्या निदर्शनास आणून दिलेली आहे. सदर वसतिगृहाची मंजूर क्षमता ही ७५ असून सन २०१३-१४ ते २०२२-२३ या कालावधीत २० ते ३० च्या दरम्यान विद्यार्थ्यांचे प्रवेश झालेले आहेत. पाल वसतिगृहाची इमारत भाडेतत्वावर आहे. तसेच सदर इमारतीमध्ये सर्व सोयीसुविधा उपलब्ध नाहीत. प्रवेशित विद्यार्थी संख्या अत्यल्प आहे. पाल हे ठिकाण सातपुडा जंगलाच्या अतिदुर्गम भागात आहे. आजूबाजूला जंगलाचे प्रमाण अधिक आहे. त्यामुळे जंगली श्वापदांमुळे विद्यार्थ्यांना धोका आहे. पाल हे ठिकाण अतिदुर्गम भागात असल्याने विजपुरवठा वरचेवर खंडीत होत असल्याने पाणीपुरवठा, नेटवर्क व इतर सोयीसुविधांपासून विद्यार्थ्यांना मुकावे लागत आहे. पाल येथे पदवीसाठी फक्त कला शाखा उपलब्ध आहे. फैजपुर येथे अनुसूचित जमातीचे शिक्षण घेणारे विद्यार्थी संख्या ५७६ इतकी आहे. फैजपुर येथे म्युनसिपल हायस्कुल, ज्युनिअर कॅालेज, पदवी, पदव्युत्तर पदवी, विविध डिप्लोमा कोर्सेस तसेच व्यवसायिक अभ्यासक्रम आहेत.

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता शासकीय मुलांचे वसतिगृह पाल, ता.रावेर या वसतिगृहाच्या जागेत बदल करुन आदिवासी मुलांचे शासकीय वसतिगृह, फैजपुर, ता.यावल, जि.जळगांव येथे स्थलांतरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी मुलांचे शासकीय वसतिगृह, पाल येथील मंजूर प्रवेश क्षमता ७५ असून सदर वसतिगृह अत्यल्प विद्यार्थी संख्येमुळे फैजपुर, ता.यावल, जि.जळगाव येथे स्थलांतरित करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. शासनाकडून मंजूर करण्यात आलेल्या शासकीय वसतिगृहाच्या ठिकाणामध्ये योग्य ते बदल करुन सदर यादी अदयावत करण्याची कार्यवाही आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांचेकडून करण्यात यावी.

३. यासाठी येणारा खर्च "मागणी क्रमांक- टी-४, २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना जनजाती क्षेत्र उपयोजना -०२ अनुसूचित जमातीचे कल्याण-२७७-शिक्षण (एक)-मागासवर्गीय मुलामुलींसाठी शासकीय वसतीगृहे सुरु करणे व त्यांचे परिरक्षण -(ए)-राज्य योजना (२२२५ १५५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१०१२१६०८२५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9CE356F38C6A70A8FFDE299AD6627F48BD01E875A7ACA38BD139B0CC5367E62D, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2023.07.10 12:18:53 +05'30'

( उदय गवस )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, यावल
५. गृहपाल, आदिवासी मुला-मुलींचे शासकीय वसतीगृह (प्रकल्प अधिकारी यांचे मार्फत)
६. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर
७. निवड नस्ती का-१२.